नाशिक जिल्ह्यातील सुरगाणा पेठ दिंडोरी, चांदवड व निफाड तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र.१०९/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- १९ जानेवारी, २०२२.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र
जा. क्र.का-५/सा.बां.प्रादे विना/प्रआ/रा.मा. दर्जोन्नत/नाशिक/४०७३/२०२१, दि. १३/०८/२०२१.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये **नाशिक जिल्ह्यातील** सुरगाणा पेठ दिंडोरी, चांदवड व निफाड तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग **रस्ते राज्यमार्ग म्हणून** दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ तसेच रस्त्याचा एकुण होणारा वापर विचारात घेता सदर रस्ते राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील सुरगाणा पेठ दिंडोरी, चांदवड व निफाड तालुक्यातील खालील प्रमुख जिल्हा मार्ग रस्ते राज्यमार्ग म्हणून समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक/ नामाभिधान |
|---|---|---|---|---|---|
| १. | गुजरात राज्य हद्द ते अंबोडे- बेडसे- ठाणगांव- बाऱ्हे- हस्ते - भनवड- वांजोळे- टिटवे - कोशिंबे - लखमापूर - वरखेडा - खेडगांव- शिंदवड - वडनेरभैरव -शिरवाडेवाणी- पालखेड - दावचवडी - कारसुळ राज्यमार्ग क्र. २७ ला मिळणारा रस्ता. | प्रमुख जिल्हा मार्ग-०३ | ०/०० ते १८/५०० १८.५०० कि.मी. | १०३.४०० कि.मी. | **राज्यमार्ग -४१४** |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग-१० | ०/०० ते ११/४०० ११.४०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग-०६ | ३०/०० ते ७५/१०० ४५.१०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग-५१ | ०/०० ते २८/४०० २८.४०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **१०३.४०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नाशिक जिल्ह्यातील राज्यमार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१०३.४०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१८३६.१९०+ १०३.४००) म्हणजेच **१९३९.५९० कि.मी.** इतकी व प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१०३.४०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी ( ४५९७.५१०- १०३.४००) म्हणजेच **४४९४.११० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२५१६२९५१५८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2022.01.25 16:31:35 +05'30'

**(ग. सं. कचरे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,नाशिक.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
१०) निवडनस्ती.